**मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी नाथनगर (उत्तर) पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या संस्थेतील ग्रंथपाल वर्ग-३ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्र.प्रतिनि २०२४/प्र.क्र.३२/प्रशि-४ (१२-अ)**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २५ जून, २०२४.

**संदर्भ :-** १) शासन निर्णय, सा.प्र.वि.क्र. एसआरव्ही -२०११/प्र.क्र.१३७/कार्या-१२, दि.१७.१२.२०१६.
२) शासन निर्णय, सा.प्र.वि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.५१०/कार्या-१२, दि.१६.०२.२०१८.
३) संचालक, मराठवाडा व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर यांचे पत्र क्र.मप्रविप्रप्र/आस्था/प्रतिनियुक्ती प्रस्ताव/कावी/२२७, दि.१८.०४.२०२३.
४) विधी व न्याय विभाग- संकिर्ण २०२३/प्र.क्र.१५१/का-६ यांचे दि.२०.०२.२०२४ चे पत्र.

**शासन आदेश :-**

मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या राज्य प्रशिक्षण धोरणान्वये घोषित करण्यात आलेल्या विभागीय प्रशासकीय प्रशिक्षण संस्थेत रिक्त असलेल्या ग्रंथपाल वर्ग-३ (वेतनश्रेणी एस-८-२५५००-८११००) या पदाकरीता प्रतिनियुक्ती धोरणाच्या प्रचलित कार्यपध्दतीनुसार श्री.सुनिल कोंडीबा सुरवसे, लिपिक-टंकलेखक, मुख्य महानगर दंडाधिकारी कार्यालय, मुंबई यांची खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे. :-

| अ.क्र. | नाव /पदनाम/वेतनश्रेणी | मुळ प्रशासकीय विभाग | प्रतिनियुक्तीचे पद/ वेतनश्रेणी | प्रतिनियुक्तीचा दिनांक | प्रतिनियुक्तीचा कालावधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.सुनिल कोंडीबा सुरवसे , लिपिक टंकलेखक, मुख्य महानगर दंडाधिकारी कार्यालय, मुंबई एस-६-१९९००-६३२०० | विधी व न्याय विभाग | ग्रंथपाल वर्ग-३ एस-८-२५५००-८११०० | आदेशाच्या दिनांकापासून | ३ वर्षे |

२. तरी विधी व न्याय विभागाने श्री.सुनिल कोंडीबा सुरवसे, लिपिक-टंकलेखक, मुख्य महानगर दंडाधिकारी कार्यालय, मुंबई यांच्या प्रतिनियुक्तीची नोंद घेवून आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. सदर प्रतिनियुक्ती महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-२ मधील खालील अटी व शर्तींच्या अधीन राहील. :-

१) प्रस्तुत प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी संबंधित विभागास लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने सेवेची आवश्यकता वाटल्यास सदर अधिका-यास परत बोलविण्यात येईल. मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या संस्थेस वरील अधिकाऱ्यांच्या सेवेची आवश्यकता नसल्यास संबंधितांना ३ महिन्याची नोटीस द्यावी लागेल. त्याचप्रमाणे शासनास सदर बाब अवगत करण्यात यावी.

२) प्रतिनियुक्तीवर असतानाच्या कालावधीतील वेतनाचा/रजा वेतनाचा खर्च मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या संस्थेने करावा.

३) महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा....) नियम १९८१ च्या परिशिष्ट-४ मध्ये विहित केलेल्या दरानुसार मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर या संस्थेकडून रजा वेतन व निवृत्ती वेतन अंशदान देण्यात यावे.

४) सर्वसाधारण भविष्य निर्वाह निधीमधील वर्गणी चालू ठेवण्यात यावी.

५) संबंधित अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी करावयाची झाल्यास त्यांच्या सेवा मूळ विभागाकडे परत करण्यात याव्यात.

४. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०६२५११२७११५१०७ असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SMITA PRASAD JOSHI

Digitally signed by SMITA PRASAD JOSHI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISRTATION DEPARTMENT, 2.5.4.20=d759e39e5163375d3782e5f6bef7edf6a25c72797123cdaa86acd09edf52baf1, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=28AA5752FA66D3A7FDEAFB1F4AB24CD90FD9D667A6880CB8CCECA18276150ACA, cn=SMITA PRASAD JOSHI
Date: 2024.06.25 11:38:04 +05'30'

**( स्मिता जोशी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) महाराष्ट्र -१/२ मुंबई/नागपूर
२. विभागीय आयुक्त, छत्रपती संभाजीनगर विभाग, जि.छत्रपती संभाजीनगर
३. उपसचिव (का.६) विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर
५. मुख्य महानगर दंडाधिकारी यांचे कार्यालय, एस्प्लनेड, मुंबई-४००००१
६. जिल्हा कोषागार अधिकारी, जि.छत्रपती संभाजीनगर
७. सहायक लेखा अधिकारी, मराठवाडा प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, नाथनगर (उत्तर) ता.पैठण, जि.छत्रपती संभाजीनगर
८. श्री.सुनिल कोंडीबा सुरवसे, लिपिक-टंकलेखक, मुख्य महानगर दंडाधिकारी कार्यालय, एस्प्लनेड, मुंबई-४००००१.

**प्रत माहितीसाठी अग्रेषित :-**

१. अपर मुख्य सचिव(सेवा) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२. निवडनस्ती सा.प्र.वि./प्रशि-४ (१२-अ).